**मत्स्यव्यवसायासाठी तलाव ठेक्याने**
**देण्याबाबत सुधारीत धोरण**

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१२०१/प्र.क्र.२२४/पदुम-१३
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ४ जानेवारी, २००२

वाचा - १) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक- मत्स्यवि २४००/प्र.क्र.१२९/ पदुम १३
दिनांक २८ जुलै, २०००
२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक- मत्स्यवि-११९९/२०/प्र.क्र.८/पदुम-१३
दिनांक १५ ऑक्टोबर, २००१

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक मत्स्यवि २४००/प्र.क्र.१२९/पदुम-१३, दिनांक २८.७.२००० व क्रमांक मत्स्यवि-११९९/२०/प्र.क्र.८/पदुम-१३, दिनांक १५.१०.२००१ नुसार मत्स्यव्यवसायाकरिता तलाव ठेक्याने देण्याचे सुधारीत धोरण जाहीर केलेले आहे. त्यात अंशतः बदल करुन शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

१. जलाशयाची न्युनतम ठेका रक्कम निर्धारित करण्यासाठी प्रतिकिलो मासळीचा दर रु. २०/- व तलाव ठेका रक्कम ही तलावातील अपेक्षित मत्स्य उत्पन्नाच्या आधारभूत किंमतीच्या १ टक्के करण्यांत येत आहे.

२. त्यानुसार दि.१५.१०.२००१ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.९ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| अ. क्र. | तलावांचे जलक्षेत्र (हेक्टर) | अपेक्षित इष्टतम बोटुकली साठवणुक प्रति हेक्टर (आकार ५० मि.मि.) | अपेक्षित मत्स्य उत्पादन प्रति हेक्टर | तलाव ठेका रक्कम आकारावयाची सुधारीत पध्दत ( प्रतिवर्षी ) |
|---|---|---|---|---|
| १ | ०.०१ तं २० | दि.१५.१०.२००१ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक ७ प्रमाणे | दि.१५.१०.२००१ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक ७ प्रमाणे | रु.३०० प्रति हेक्टर |
| २ | २०.०१ तं ६० | | | रु.६०००+२० हेक्टरपुढील प्रत्येक हेक्टरासाठी रु.१२० |
| ३ | ६०.०१ ते ३०० | | | रु.१०८००+६० हेक्टरपुढील प्रत्येक हेक्टरासाठी रु.६० |
| ४ | ३००.०१ ते १३०० | | | रु.२५२००+३०० हेक्टरपुढील प्रत्येक हेक्टरासाठी रु.३० |
| ५ | १३००.०१ ते ५००० | | | रु.५५२००+१३०० हेक्टरपुढील प्रत्येक हेक्टरासाठी रु.२० |
| ६ | ५०००.०१ व पुढील | | | रु.१२९२००+५००० हेक्टरपुढील प्रत्येक हेक्टरासाठी रु.१० |

GR-200201221223250000-0400.र/-

३. ठेका घेताना अपेक्षित इष्टतम बोटुकली साठवणूकीसाठी प्रति हेक्टरी जो खर्च लागणार आहे त्याच्या १० टक्के रक्कम सुरक्षा अनामत म्हणून सहकारी संस्थांनी भरणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(श्या. ना. धंकाते)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-५१
प्रादेशिक मत्स्यव्यवसाय उपसंचालक, मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
सहाय्यक मत्स्यव्यवसाय संचालक, मुंबई/पालघर (ठाणे)/अलिबाग (रायगड)/रत्नागिरी/मालवण (सिंधुदुर्ग)/ चंद्रपूर/ भंडारा
सर्व जिल्हा मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग.
सर्व कार्यासने, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती.

GR-200201221223250000-0400.